पुरातत्व विभाग पुणे, छत्रपती संभाजीनगर, नांदेड कार्यालयाच्या अधिनस्त राज्य संरक्षित स्मारकांच्या परिसरात स्वातंत्र्याच्या अमृत महोत्सवानिमित्त सुलभ जनसुविधा केंद्र उभारणेच्या कामाकरीता अग्रिम रकमेस मान्यता देणेबाबत...

# महाराष्ट्र शासन

## पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग

**शासन निर्णय क्रमांक: जसुकें-२०२३/प्र.क्र.१६२/सां.का.३**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक : ३१ मार्च, २०२४

**वाचा :-** १) पर्यटन व सांस्कृतिक विभाग शासन निर्णय क्र.स्वाअम-२०२३/प्र.क्र.५४/सां.का.३ दि.१४.०३.२०२३

२) पर्यटन व सांस्कृतिक विभाग शासन निर्णय क्र.स्वाअम-२०२३/प्र.क्र.५५/सां.का.३ दि.१४.०३.२०२३

३) पर्यटन व सांस्कृतिक विभाग शासन निर्णय क्र.स्वाअम-२०२३/प्र.क्र.५६/सां.का.३ दि.१४.०३.२०२३

४) पर्यटन व सांस्कृतिक विभाग शासन निर्णय क्र. जसुकें-२०२३/प्र.क्र.१६२/सां.का.३ दि.०९.०६.२०२३

५) संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय यांची पत्रे जा.क्र. स्मारके/२०२४/१३६९-१३७१, दि. २८.०३.२०२४

**प्रस्तावना :-**

"स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव" अंतर्गत पुरातत्व विभागातील अधिनस्त स्मारकांच्या ठिकाणी जनसुविधा केंद्राची उभारणी करण्यात येणार आहे. त्यामुळे पुरातत्व विभाग, पुणे अधिनस्त १२ स्मारकांच्या संरक्षित परिसरात जनसुविधा केंद्र उभारण्यासाठी संदर्भाधीन क्र.०१ च्या शासन निर्णयान्वये रु.१२,७०,४८,११४/- इतक्या रकमेस प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. पुरातत्व विभाग, छत्रपती संभाजीनगर अधिनस्त १३ स्मारकांच्या संरक्षित परिसरात जनसुविधा केंद्र उभारण्यासाठी संदर्भाधीन क्र.०२ च्या शासन निर्णयान्वये रु.११,९७,८९,०८१/- इतक्या रकमेस प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. तसेच पुरातत्व विभाग, नांदेड अधिनस्त १० स्मारकांच्या संरक्षित परिसरात जनसुविधा केंद्र उभारण्यासाठी संदर्भाधीन क्र.०३ च्या शासन निर्णयान्वये रु.८,१०,२१,६०१/- इतक्या रकमेस प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. यासाठी संबंधित सहायक संचालक, पुरातत्व विभागाने सुलभ इंटरनॅशनल सोशल सर्विस ऑर्गनायझेशन या संस्थेशी सामंजस्य करार केला आहे. पुरातत्व विभाग, पुणे, छत्रपती संभाजीनगर व नांदेड या कार्यालयाच्या अधिनस्त स्मारकांवर जनसुविधा केंद्र बांधावयाच्या कामाकरीता १५ टक्के अंमलबजावणी शुल्कासह

अंदाजपत्रकानुसार पहिला हप्ता म्हणून ३० टक्के अग्रिम रक्कम रु.९,८३,५७,६३८/- इतक्या रकमेस संदर्भाधीन क्र.०४ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. पुरातत्व विभाग, पुणे, छत्रपती संभाजीनगर व नांदेड या कार्यालयाच्या अधिनस्त स्मारकांवर जनसुविधा केंद्र बांधावयाच्या कामाकरीता १५ टक्के अंमलबजावणी शुल्कासह अंदाजपत्रकानुसार दुसरा हप्ता म्हणून ३० टक्के अग्रिम रक्कम देण्याबाबतचा प्रस्ताव संचालनालयाने संदर्भ क्र.०५ नुसार शासनास सादर केला आहे. त्यानुसार सदर रकमेस वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

या शासन निर्णयान्वये खालील पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालयाच्या अधिनस्त विभागीय कार्यालयाच्या अखत्यारीतील राज्य संरक्षित स्मारकांच्या परिसरात जनसुविधा केंद्र बांधण्यासाठी खालील विवरणपत्रात नमूद केल्याप्रमाणे वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | विभागीय कार्यालय | प्रशासकीय मान्यता रक्कम | एकूण दुसरा हप्ता | अक्षरी रुपये |
|---|---|---|---|---|
| १ | पुणे विभाग | रु.९,३६,२४,२४५/- | रु.९३,७५,९८९/- | रुपये त्र्यान्नव लक्ष पंच्याहत्तर हजार नऊशे एकोणनव्वद मात्र |
| २ | छत्रपती संभाजीनगर विभाग | रु.८,८२,७४,९२९/- | रु.१,६२,१२,२४७/- | रुपये एक कोटी बासष्ठ लक्ष बारा हजार दोनशे सत्तेचाळीस मात्र |
| ३ | नांदेड विभाग | रु.५,९७,०६,४१२/- | रु.९६,२८,६४९/- | रुपये शहान्नव लक्ष अठ्ठावीस हजार सहाशे एकोणपन्नास मात्र |
| | **एकूण रुपये** | | **रु.३,५२,१६,८८५/-** | **रुपये तीन कोटी बावन्न लक्ष सोळा हजार आठशे पंचवीस मात्र** |

०२. यासाठी होणारा खर्च मागणी क्र. झेडडी-०२, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, २२०५ कला व संस्कृति (००) १०३, पुरातत्वशास्त्र, (०१) (०६) राज्यातील ऐतिहासिक व सांस्कृतिकदृष्ट्या महत्वाचे किल्ले आणि धार्मिक स्थळे यांची जपणूक व संरक्षण (कार्यक्रम), (२२०५ १३०२) २७ लहान बांधकामे या लेखाशिर्षाखाली सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरीता उपलब्ध निधीतून भागविण्यात यावा.

०३. संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय यांना यासाठी नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांना अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यास या संबंधिच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

०४. हा शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र -२०१३/ प्र.क्र.३०/ २०१३/ विनियम, भाग २, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला उपविभाग तीन मधील अनुक्रमांक ४ मधील परिच्छेद क्र. २७(२) “अ” नुसार वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ३१४/२०२४, व्यय-१५, दि.३१.०३.२०२४ अन्वये दिलेल्या सहमतीने तसेच वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

०५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३३१२१४८३८५७२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUMANT DINKAR PASHTE

Digitally signed by SUMANT DINKAR PASHTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=58694d4cd2bd16f0ab6514fc8598a9aa217e2508455856a701adb1bb6ef9b120, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AFC006DAAE95D0F2CF7C7F09CA18CF0C9C9363A05E6070B1C03455CF1CB43586, cn=SUMANT DINKAR PASHTE
Date: 2024.03.31 21:58:14 +05'30'

**( सु. दि. पाष्टे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

प्रधान सचिव (सां.का.) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
उपसचिव (सां.का.३) यांचे स्वीय सहायक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
सहाय्यक संचालक, पुरातत्व विभाग, पुणे, छत्रपती संभाजीनगर, नांदेड.
महालेखापाल -१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
महालेखापाल -२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
महालेखापाल -१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
महालेखापाल -२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
जिल्हा कोषाधिकारी, पुणे, छत्रपती संभाजीनगर, नांदेड.
कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती, सां.का.३